**संचालक, कला संचालनालय यांच्या कार्यालयाकरिता वाहन - चालकाचे काल्पनिक पद निर्माण करण्याबाबत.**

# महाराष्ट्र शासन

## उच्च व तंत्रशिक्षण विभाग,

## शासन निर्णय क्र.अेडीआर -२७१७/प्र.क्र.०९/१८/तांशि-६

मंत्रालय विस्तार भवन, मादाम कामा मार्ग,
हुतात्मा राजगुरू चौक, मुंबई-४०००३२.
दिनांक:- २५ जानेवारी, २०१९.

वाचा :- १. शासन निर्णय क्रमांक-असंक-१००१/प्र.क्र.२९/२००१/वित्तीय सुधारणा, दिनांक १० सप्टेंबर, २००१.
२.शासन निर्णय क्रमांक-एडीआर-११०१/(८८/०१)तांशि-७, दिनांक ३० डिसेंबर, २००६.
३. वित्त विभागाचे परिपत्रक क्रमांक पदनि-२०१०/८४/१०/विसु-१, दिनांक २७ सप्टेंबर, २०१०.
४. वित्त विभागाचे परिपत्रक क्रमांक पदनि-२०१३/प्र.क्र.११/१३/विसु-१, दिनांक २ फेब्रुवारी, २०१३.
५. वित्त विभागाचे परिपत्रक क्रमांक पदनि-२०१३/प्र.क्र.११२/१३/वित्तीय सुधारणा-१, दिनांक २ डिसेंबर, २०१३.
६.संचालक, कला संचालनालय यांचे पत्र क्र. डिओअे-२०१८/तीन/००७८, दिनांक १७ जानेवारी, २०१८
७.वित्त विभागाचे पत्र क्रमांक पदनि-२०१९/प्र.क्र.०३/आपुक, दिनांक १० जानेवारी, २०१९.

**प्रस्तावना :-**

कला संचालनालय, त्यांची क्षेत्रीय कार्यालये आणि शासकीय कला महाविद्यालयांच्या सुधारित आकृतीबंधाला दि. ३० डिसेंबर, २००६ च्या शासन निर्णयान्वये मान्यता प्राप्त झाली आहे. त्यानुसार संचालक, कला संचालनालय यांच्या कार्यालयाकरिता वाहन चालकाचे एक पद मंजूर आहे. सदर पदावर कार्यरत असलेले कर्मचारी दि. ३० जून, २०१२ रोजी नियतवयोमानानुसार सेवा निवृत्त झाले असून, तेव्हा पासून सदरचे पद रिक्त आहे.

संचालक, कला संचालनालय यांच्या कार्यालयाकरिता नवीन वाहन खरेदी करण्यास मान्यता देण्यात आली आहे. सदर वाहनाकरिता वाहन चालकाचे पद आवश्यक आहे. तथापि, कला संचालनालयाच्या आस्थापनेवरील वाहन चालकाचे पद सहा महिन्यांपेक्षा अधिक कालावधीसाठी रिक्त राहिल्याने ते वित्त विभागाच्या दिनांक १० सप्टेंबर, २००१ च्या शासन निर्णयानुसार व्यपगत झाले आहे. त्याबाबतचा प्रस्ताव वित्त विभागास सादर करण्यात आला होता. त्यानुसार वाहन चालकाचे काल्पनिक पद निर्माण करुन ते बाह्ययंत्रणेद्वारे भरण्यास वित्त विभागाच्या उपसमितीच्या (दि. ९ जून, २०१७ च्या शासननिर्णयान्वये गठित उपसमिती) दि. ०८ जानेवारी, २०१९ च्या बैठकीत मान्यता प्राप्त झाली आहे. त्यानुषंगाने पुढीलप्रमाणे निर्णय घेण्यात आला आहे.

**शासन निर्णय -**

कला संचालनालयातील वाहन चालकाच्या रिक्त पदाऐवजी १ "काल्पनिक पद" निर्माण करुन ते बाह्ययंत्रणेद्वारे भरण्यास खालील अटी व शर्तीच्या अधिनतेने मान्यता देण्यात येत आहे.

अ) वाहनचालकाचे काम ठेकेदार / कंपनी / संस्थेकडून, शासनाने विहित केलेल्या पद्धतीने निवीदा मागवून, सक्षम प्राधिकाऱ्याच्या मान्यतेने करुन घ्यावे.

ब) ज्या ठेकेदारास / कंपनीस / संस्थेस काम द्यावयाचे आहे, त्यांच्याबरोबर करार करावा. सदर " करारनाम्यामध्ये ठेकेदार / कंपनी / संस्थेमध्ये काम करणाऱ्या कर्मचाऱ्यांच्या सेवेचे कोणतेही उत्तरदायित्व शासनावर असणार नाही," अशी अट नमूद करावी.

क) बाह्ययंत्रणेद्वारे करुन घेण्यात येणाऱ्या वाहन चालकाच्या कामाचे प्रदान " वेतन " या तपशिलवार शिर्षाखाली न दाखवता "कार्यालयीन खर्च" या तपशीलवार शिर्षाखाली दाखवावे.

ड) नियमित पद्धतीने पद भरण्यावरील खर्चाच्या तुलनेत बाह्ययंत्रणेद्वारे वाहन चालकाचे काम केल्यामुळे खर्चात १० ते २५ टक्के बचत होणे आवश्यक आहे. सदर बचत करण्याची तसेच, त्याची नोंद विहित प्रपत्रात ठेवण्याची जबाबदारी संचालक, कला संचालनालय यांची राहील.

२. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१९०१२५११३७०६१६०८ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Sandesh Rajaram Utekar

Digitally signed by Sandesh Rajaram Utekar
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Higher Technical Education Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=009789e9fe23fde06096381e43bebecd32b5c692c899745eee7d89d805005a87, cn=Sandesh Rajaram Utekar
Date: 2019.01.25 11:46:00 +05'30'

**(सं. रा. उतेकर)**
कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन

**प्रति,**

१. सचिव, उच्च व तंत्रशिक्षण विभाग, मंत्रालय, मुंबई यांचे स्वीय सहाय्यक.
२. अपर मुख्य सचिव, सामान्य प्रशासन विभाग,मंत्रालय, मुंबई यांचे स्वीय सहाय्यक.
३. संचालक, कला संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
४. महालेखापाल, (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र १ व २, मुंबई /नागपूर,
५. महालेखापाल, (लेखापरिक्षा), महाराष्ट्र १ व २, मुंबई /नागपूर,
६. अधिदान व लेखा परिक्षा, मुंबई.
७. निवासी लेखा परिक्षा अधिकारी, मुंबई.
८. निवडनस्ती /तांशि ६.